महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानासाठी दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (DDU-GKY) अंतर्गत जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गासाठी प्रलंबित समरुप राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०२०/प्र.क्र.१०/योजना-३
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १४ सप्टेंबर, २०२१

**वाचा :-**

१. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१७०२५/०१/२०१५ डीडीयु-जीकेवाय-३३/सी, दिनांक २४ डिसेंबर, २०१९.
२. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२०/प्र.क्र.१०/योजना-३, दिनांक १८ सप्टेंबर, २०२०.
३. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्र.मजिअ-२०२०/प्र.क्र.१०/योजना-३, दिनांक २६ मार्च, २०२१.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/१४७५/२०२१, दिनांक ०६ जुलै, २०२१.
५. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२०२०/प्र.क्र.०८/कार्यासन-६, दिनांक २६ ऑगस्ट, २०२१.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१९ ते २०२२ या तीन वर्षांकरीता दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजनेच्या (DDU-GKY) जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गासाठी पहिला हप्ता म्हणून रु.४६,०४,२५,०००/- इतका निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सदर केंद्र हिस्सा रु.१५,१२,००,०००/-व रु.३०,९२,२५,०००/- तसेच राज्य हिस्सा रु.१०,०८,००,०००/- व रु.२०,६१,००,०००/- इतका निधी संदर्भाधीन क्र.२ व ३ अन्वये वितरीत केला आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) केंद्र हिस्सा (२५०१ २९५३) याकरिता रु.९६,००,००,०००/- तसेच केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २९३५) याकरिता रु.२५,००,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून उर्वरीत केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०२१-२२ मध्ये दीन दयाळ उपाध्याय ग्रामीण कौशल्य योजना (DDU-GKY) जनजाती क्षेत्र (अनुसूचित जमाती) (TSP) प्रवर्गासाठी केंद्र समरुप राज्य हिस्सा (२५०१ २९३५) याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.५०,०००/- (रुपये पन्नास हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.५०,०००/- चा खर्च "मागणी क्र.टी-५, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०१, एकात्मीकृत ग्रामविकास कार्यक्रम, ७९६, जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०५) आजीविका अंतर्गत कौशल्य विकासासाठी विशेष प्रकल्पावरील वित्तीय सहाय्य (महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियान) (राज्याचा हिस्सा) (कार्यक्रम), ३३, अर्थसहाय्य (२५०१ २९३५)" या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसुरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीमूधन झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षानिहाय / उपलेखाशीर्षानिहाय साध्य झालेल्या भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग व ग्राम विकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावे.

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

७. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

८. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

९. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक २४ जून, २०२१ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.७०२/व्यय-१४, दिनांक १३.०८.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१४११३१५६२९२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, serialNumber=6721aca60d5973c4d26547269488f4f9d7c98360213c1a8ca7eccc36b35448ff, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2021.09.14 12:03:59 +05'30'

(दि. बा. पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२) प्रधान सचिव व निवासी आयुक्त (गुंतवणूक व राजशिष्टाचार), महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
५) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे.
६) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७) कक्ष अधिकारी (का.६/का.१७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) वित्त विभाग (व्यय-१४) व ( अर्थ-१९) मंत्रालय, मुंबई-३२.
९) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास विभाग.
१०) निवडनस्ती.